संगणक सांकेतांक - २०१७०१२४१२५६१०४२०७

**नागरिकांची सनद तयार करुन प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्र - नासद -१००६/ प्र.क्र.१०३ /०६/१८-अ

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०३ ऑगस्ट,२००९

**वाचा:-** १) शासन परिपत्रक ,सामान्य प्रशासन विभाग, क्र. नासद-२००७/११५/प्र.क्र.१८/०७/१८-अ. दि.१३ ऑगस्ट,२००७

**परिपत्रक :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ८(१) व (२) मधील तरतुदीनुसार प्रत्येक विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांनी नागरिकांची सनद तयार करुन प्रसिध्द करणे बंधनकारक आहे. बहुतेक सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी नागरिकांची सनद प्रसिध्द केली आहे. उर्वरित विभाग व कार्यालयांनी नागरिकांची सनद तयार करण्याबाबतची कार्यवाही लवकरात लवकर पूर्ण करावी.

उपरोक्त संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये नागरिकांची सनद प्रसिध्द करण्याबाबत व नाममात्र किमतीला नागरिकांना उपलब्ध करुन देण्याबाबत सूचना देण्यात आल्या होत्या. मात्र त्या सूचनांप्रमाणे आवश्यक कार्यवाही होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. यास्तव नागरिकांच्या सनदेला प्रसिध्दी देण्याकरिता पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(१) सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी सर्व दृष्टीने परिपूर्ण व अद्ययावत अशी नागरीकांची सनद "लोकराज्य" मासिकात प्रसिध्दी देण्यासाठी स्वतंत्रपणे महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना पाठवावी. याबाबत महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना निर्देश देण्यात आले आहेत.

(२) प्रत्येक मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांनी सनदेमध्ये अंतर्भूत असणारी, सर्वसामान्य जनतेस उपयुक्त ठरणारी तक्तारुपी माहिती (उदा. कार्यालय/विभागाकडून पुरविण्यात येणा-या सेवा, संबंधित अधिकारी, सेवा पुरविण्यास लागणारा कालावधी इ.) शासनाने विहीत केल्याप्रमाणे कार्यालयाच्या दर्शनी भागात फलकावर लावावी.

...२..

(३) सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक ~~२००९०६०३१६५५०२००१~~ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( सुधीर ठाकरे )
सचिव,(प्र. सु. व र. व का.)

प्रत,

१ मा.राज्यपालांचे सचिव
२ मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३ मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
४ सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक.
५ मुख्य सचिव
६ शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
७ प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
८ प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
९ महाप्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
१० सचिव,राज्य निवडणूक आयोग, मुंबई
११ सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई
१२ सचिव,विधान मंडळ सचिवालय, विधान भवन,मुंबई (५ प्रती)
१३ सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई
१४ सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई
१५ सर्व मंत्रालयीन विभाग
१६ महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
१७ सर्व विभागीय आयुक्त
१८ सर्व जिल्हाधिकारी,
१९ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२० मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख
२१ सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
२२ निवड नस्ती (कार्यासन १८-अ )